**हंगाम २०२३-२४ मध्ये किमान आधारभूत दराने खरेदी केलेल्या कापसाची रक्कम शेतकऱ्यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी (बिनव्याजी) कर्ज मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कापूस-२०२४/प्र.क्र. ०८/१०-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३० मार्च, २०२४.

**संदर्भः-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३
२) शासन निर्णय क्रमांक : कापूस-२०२४/प्र.क्र. ०८/१०-स, दि.२९.०१.२०२४

**प्रस्तावना :-**

कापूस हंगाम २०२३-२४ मध्ये किमान आधारभूत दराने कापूस खरेदी केल्यानंतर कापसाची रक्कम शेतकऱ्यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाला वित्तीय संस्थांकडून कर्ज घेण्यासाठी दुराव्यापोटी बिनव्याजी कर्ज (मार्जीन मनी) लेखाशिर्ष "(०१)(०३) कापूस प्रापण योजनेच्या कार्यान्वयनासाठी सीमांतिक रक्कम या योजनेच्या (६४२५००६४)" अंतर्गत अर्थसंकल्पिय तरतूद रुपये १०.०० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) एवढया रकमेतून रु.०७.०० कोटी (रुपये सात कोटी फक्त) एवढी रक्कम दिनांक २९.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली आहे. उर्वरीत रुपये ०३.०० कोटी (रुपये तीन कोटी फक्त) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

कापूस हंगाम २०२३-२४ मध्ये कापसाचे दर किमान अधारभूत किंमतीच्या (Minimum Support Price) पातळीवर आले असल्याने महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाला किमान हमी दराने कापूस खरेदी करावा लागणार आहे. महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाने किमान आधारभूत दराने खरेदी केलेल्या कापसाचे चुकारे शेतकऱ्यांना वेळेवर अदा करण्यासाठी वित्तीय संस्थांकडून कर्ज घेण्यासाठी दुरावा निधी (मार्जीन मनी) म्हणून अर्थसंकल्पिय तरतूद रुपये १०.०० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) पैकी उर्वरीत रु.०३.०० कोटी (रुपये तीन कोटी फक्त) एवढी रक्कम वित्त विभागाच्या पूर्व मान्यतेने महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी बिन व्याजी कर्ज स्वरुपात उपलब्ध करुन देण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१) सदर मार्जीन मनीचा उपयोग महासंघाद्वारे हमी दराने खरेदी केलेल्या कापसाचे चुकारे शेतकऱ्यांना वेळेवर अदा करण्यासाठी वित्तीय संस्था/बँकाकडून कर्ज घेण्यापोटी बँकेत मार्जीन

(दुरावा) म्हणून ठेवण्यासाठी विनियोग करावा लागेल, याबाबतची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाची राहील.

२) सदर मार्जीन मनी इतरत्र बँकेत दिर्घ मुदतीच्या ठेवीत गुंतविण्यात येऊ नये.

३) हंगाम संपल्यावर सदर मार्जीन मनी शासनास तात्काळ परतफेड करणे आवश्यक राहील. जर हे शक्य झाले नाही तर त्यामागील कारणे शासनास कळविणे बंधनकारक राहील.

४) ज्या प्रयोजनासाठी मार्जीन मनी वितरित करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी विनियोग करुन ३ महिन्यात तसे शासनास उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

५) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाने C.C.I. सोबत रितसर करार करावा.

**२.** या कारणासाठी होणारा खर्च पुढे नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३- २४ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा :-

६४२५, सहकारासाठी कर्जे,
(१०८) इतर सहकारी संस्थांना कर्जे,
(०१) पणन सहकारी संस्था,
(०१) (०३) कापूस प्रापण योजनेच्या कार्यान्वयनासाठी सिमांतीक रक्कम (६४२५००६४) (कार्यक्रम),
“५५- कर्जे व आगाऊ रक्कमा”

**३.** सदर विनव्याजी कर्जाची रक्कम अधिदान व लेखादिकारी, मुंबई येथून काढण्यासाठी व ती महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेस अदा करण्यासाठी श्री.सु.पु.पागांरकर, कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, श्री.सं.पु.खोरगडे, सह सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** सदर रक्कम आर टी जी एस/एन ई एफ टी द्वारे प्रदान करण्यासाठी तपशील पुढीलप्रमाणे :-

| | | |
|---|---|---|
| १) | संस्थेचे नाव | महाराष्ट्र स्टेट को-ऑप. कॉटन ग्रोअर्स मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड. |
| २) | कार्यालयाचा पत्ता | २०१, जॉली भवन-२, २ रा मजला, निर्मला निकेतनच्या समोर, चर्चगेट, मुंबई-४०० ०२०. |
| ३) | बँक खाते क्रमांक | 0002207810015097 |
| ४) | बँक खात्याचा प्रकार | चालू खाते (करंट खाते) |
| ५) | बँकेचे नाव | दि महाराष्ट्र स्टेट को-ऑप बँक लि. |
| ६) | बँक शाखेचे नाव व पत्ता | ९, महाराष्ट्र चेंबर्स ऑफ कॉमर्स मार्ग, फोर्ट, मुंबई-४००००१ |
| ७) | एम.आय.सी.आर.क्रमांक | 400082002 |
| ८) | आय एफ सी सांकेतांक | MSCI0082002 |

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३०८/व्यय-२/२०२४, दि.२७.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३३०१६४१३५१६०२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHAILESH SHASHIKANT SURVE

Digitally signed by SHAILESH SHASHIKANT SURVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=de61ac402ef01eec8d6c6d90fb32c82cc308744e2b851cc16fb39fe7ce1f1dd3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0E8ED2F069FE90F6EA4E2DFC43BD83581600732F141DAF3517043067D7724F4B, cn=SHAILESH SHASHIKANT SURVE
Date: 2024.03.30 16:51:30 +05'30'

**( शैलेश श. सुर्वे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, मुंबई-१/नागपूर-२.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या., २०१, जॉली भवन, निर्मला निकेतनच्या समोर, चर्चगेट, मुंबई-४०००२०.
३) पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) वित्त विभाग, (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
५) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
७) सह सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सह सचिव (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती, कार्यासन १०-स